डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटींकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६ ८६१३) लेखाशीर्षाअंतर्गत अनुदान वितरण करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सावvi-२०२१/प्र.क्र.२३/फ-११**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**दिनांक : ७.१०.२०२१**

वाचा:-

१) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.६.४.२०२१

२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३, दि.२४.६.२०२१

३) प्रधान मुख्य वनसंरक्षक,(अर्थसंकल्प, नियोजन व विकास) म.रा. नागपूर, यांचे पत्र क्र.कक्ष-१/पी/यो/ नबाप्र/प्र.क्र.२७/६९/२०२१-२२, दिनांक १५.६.२०२१.

४) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र. सावvi-२०२१/प्र.क्र.२३/फ-११ दि. ६.०७.२०२१.

प्रस्तावना :-

सामाजिक वनीकरणाचे महत्व लक्षात घेऊन वृक्ष लागवड व संवर्धन करण्याकरिता सामाजिक वनीकरणांतर्गत डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६ ८६१३) या योजनेंतर्गत सन २०२१-२२ करिता ५०-इतर खर्च या उदिष्टांतर्गत रू.१०००.०० लक्ष इतका नियतव्यय अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र ३ च्या पत्रान्वये सदर योजनेंतर्गत रू.१००६.३४ लक्ष रकमेचा चालू बाब प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुषंगाने प्रस्ताव वित्त विभागास सादर केला असता, वित्त विभागाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये बीडीएस प्रणालीवर वितरीत करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने कार्यवाही करण्याबाबत कळविले आहे. त्यानुसार शासन निर्णय दि. ६.०७.२०२१ अन्वये सदर योजनेंतर्गत ५०-इतर खर्च या उद्दिष्टांतर्गत १० टक्के निधी म्हणजेच रु. १००.०० लक्ष वितरीत करण्यात आला आहे. आता बीडीएस प्रणालीवर वित्त विभागाने एकूण रु. २५०.०० लक्ष निधी उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुसार उर्वरित निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात सामाजिक वनीकरण विभागामार्फत राबविण्यात येणाऱ्या डॉ. बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे आधुनिकीकरण व बळकटीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोप निर्मितीसाठी जिल्हा व तालुका स्तरावर रोपवाटीका निर्मिती (२४०६ ८६१३) या योजनेंतर्गत ५०- इतर खर्च या उदिष्टांतर्गत १५ टक्के निधी म्हणजेच रू. १५०.०० लक्ष निधी वितरित करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्याकडे सुपूर्त करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखड्याप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. सदर निधी मंजूर असलेल्या योजनांवरच खर्च करण्यात यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

३. सदर निधी वितरित करण्यापूवी प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी सदर योजनेसाठी सन २०२१-२२ करिता वितरित केलेला निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली व्यतिरिक्त अन्यत्र ठिकाणी वळता केला नसल्याची खात्री करावी.

४. सदर निधी खर्च करताना वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक १ व २ येथील शासन परिपत्रक/ निर्णयातील तरतूदी व महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियम पुस्तिका, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका यामध्ये उल्लेख केलेल्या तरतुदींनुसार व वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे पालन करण्यात यावे.

५. जिल्हानिहाय वितरीत तरतुदीची माहिती व राबविण्यात आलेल्या कार्यक्रमाची/झालेल्या खर्चाचा तपशील शासनास दरमहा विहित प्रपत्रात सादर करण्यात यावा. तसेच योजनेचे संनियंत्रण प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्यामार्फत व्हावे.

६. सदर योजने अंतर्गत होणारा खर्च खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२२ च्या मंजूर अर्थसंकल्पीत निधीतून खर्ची टाकण्यात यावा.

मागणीक्र.सी-७,

२४०६ वनीकरण व वन्यजीवन, (योजनांतर्गत)

(०३) (०४) डॉ.बाबासाहेब आंबेडकर शासकीय रोपवाटीकांचे बळकटीकरण व आधुनिकीकरण व उच्च तंत्रज्ञानाद्वारे रोपे निर्मितीसाठी जिल्हा व तालुकास्तरावर रोपवाटीका निर्मिती"(२४०६ ८६१३)

५० - इतर खर्च

७. सदर शासन निर्णय संदर्भ क्रमांक १ व २ येथील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकानुसार विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११००७१७५४४९७४१९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2021.10.07 17:56:28 +05'30'

**( अरविंद आपटे )**
**मुख्य वनसंरक्षक ( मंत्रालय )**

**प्रत,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक, (वनबल प्रमुख ),महाराष्ट्र राज्य, नागपूर.

२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३. प्रधान मुख्य वनसंरक्षक, सामाजिक वनीकरण , महाराष्ट्र राज्य, पुणे.
४. मुख्य वनसंरक्षक/ वनसंरक्षक ( प्रादेशिक ) (११ वृत्त )
५. वनसरंक्षक , सामाजिक वनीकरण ( ६ वृत्त )
६. उप वनसंरक्षक (प्रा) (सर्व)/ विभागीय वन अधिकारी (प्रा)/ उपविभागीय वन अधिकारी (प्रा)
७. विभागीय वन अधिकारी,सामाजिक वनीकरण ( सर्व जिल्हे )
८. महालेखापाल, (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ व २ , मुंबई व नागपूर,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई ४०० ०३२.
११. निवासी परिक्षा लेखा अधिकारी,मुंबई
१२. वित्त विभाग,व्यय-१०,अर्थसंकल्प-०६ मंत्रालय, मुंबई-३२
१३. कार्यासन अधिकारी, फ-२,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. कार्यासन अधिकारी, ब-१,महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१५. उप सचिव/अवर सचिव (सर्व), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१६. **निवडनस्ती फ**-११.